पिण्याच्या पाण्याच्या टंचाई अंतर्गत वर्धा जिल्हयातील आर्वी, कारंजा, आष्टी तालुक्यातील ९ गावातील नळ पाणी पुरवठा योजनांच्या विशेष दुरुस्ती प्रस्तावास " विशेष बाब "म्हणून मंजूरी देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः टंचाई २०२४/प्र.क्र. ५२ /पापु १४**
जी. टी. रुग्णालय इमारत संकुल, ७ वा मजला, लोकमान्य टिळक मार्ग
मंत्रालय, मुंबई ४०० ००१
तारीख: १३ मे, २०२४

वाचा -

१) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग. क्रमांकः टंचाई १०९९/प्र.क्र.१२/पापु १४, दिनांक ३.२.१९९९
२) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांकः टंचाई २०१८/प्र.क्र.२०/पापु १४, दिनांक १४.०२.२०१८
३) जिल्हाधिकारी, वर्धा यांचे पत्र क्रमांक जा.क्र.काअ/ग्रापापुवि/जिपव/तांशा/१२५०/२०२४, दिनांक ०६.०५.२०२४

प्रस्तावना -

जिल्हाधिकारी, वर्धा यांनी संदर्भ क्रमांक -३ येथील दिनांक ०६.०५.२०२४ च्या पत्रान्वये आर्वी, कारंजा व आष्टी तालुक्यातील काही गावांमध्ये वितरण व्यवस्था नादुरुस्त असल्यामुळे काही गावांतील नळ पाणी पुरवठा योजनांची विशेष दुरुस्ती करणे आवश्यक असल्याने टंचाई उपाययोजनेतंर्गत सादर केलेल्या प्रस्तावास एक "विशेष बाब" म्हणून प्रशासकीय मान्यता देण्याची विनंती शासनास केली आहे. सदर प्रस्तावातील प्रत्येक गावातील कामाच्या अंदाजपत्रकास कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, वर्धा यांनी स्वतंत्ररित्या तांत्रिक मान्यता प्रदान केली आहे.

राज्यात कमी पर्जन्यमानामुळे दुष्काळी / दुष्काळसदृश्य परिस्थिती निर्माण झाली असून त्यामुळे राज्यात ब-याच ठिकाणी भीषण पाणीटंचाई उद्भवली आहे. महसूल व वन विभागाने (मदत व पुनर्वसन) दिनांक १०.११.२०२३ व १६.०२.२०२३ रोजीच्या शासन निर्णयान्वये वर्धा जिल्हयात दुष्काळ सदृश्य परिस्थिती घोषित करण्यात आली आहे. सदर वस्तुस्थिती, भारत निवडणूक आयोगाच्या दिनांक ०२.०१.२०२४ रोजीच्या पत्रातील मार्गदर्शक सूचना अ.क्र. III (i) तसेच, दुष्काळ व्यवस्थापन संहिता, २०१६ मधील प्रकरण-४ नुसार सदर प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

प्रस्तावनेत नमूद केलेली वस्तुस्थिती विचारात घेऊन जिल्हाधिकारी, वर्धा यांनी सादर केलेल्या प्रस्तावाच्या अनुषंगाने या शासन निर्णयासोबत जोडण्यात आलेल्या परिशिष्टमध्ये नमूद केलेल्या आर्वी, कारंजा व आष्टी तालुक्यातील ९ गावांच्या नळ पाणी पुरवठा योजनेच्या विशेष दुरुस्तीच्या कामास खालील अटींच्या अधिन राहून टंचाई अंतर्गत एक “ विशेष बाब “ म्हणून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे :-

१) सदर योजनेच्या कामाचा राजकीय फायदा/लाभ मिळण्याच्या अनुषंगाने आदर्श आचारसंहिता कालावधीमध्ये विपरीत प्रसिध्दी होणार नाही याची जिल्हाधिकारी, वर्धा यांनी दक्षता घ्यावी.

२) सदर प्रस्तावात नमूद केलेली सर्व कामे ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, वर्धा यांचेमार्फत करणे आवश्यक राहील.

३) सदर योजनेची कामे अस्तिवातील नियम विचारात घेऊन विहित पध्दतीने निविदा/ ई-निविदा मागवून करावीत. जादा किंमतीच्या निविदा स्विकृत करण्यात येऊ नयेत.

४) योजनेची निविदा अल्प मुदतीची (०७ दिवस) काढण्यास परवानगी देण्यात येत आहे.

५) निविदा प्रक्रीया दिनांक २२ मे, २०२४ पर्यंत पूर्ण करुन कार्यारंभ आदेश देणे आवश्यक आहे.

६) योजनेची कामे दिनांक २२ जून, २०२४ पर्यंत पूर्ण करुन योजनेतून पाणी पुरवठा सुरु होणे आवश्यक आहे.

७) योजनेची कामे मंजूर /मान्यता प्राप्त किंमतीमध्येच तातडीने पूर्ण होतील याची दक्षता घ्यावी. योजनेची किंमत वाढल्यास त्यास शासन जबाबदार राहणार नाही.

८) कोणत्याही कारणाने योजनेच्या खर्चात वाढ झाल्यास त्याकरिता शासनाकडून अनुदान उपलब्ध करुन देण्यात येणार नाही.

२. **याबाबत होणारा खर्च “मागणी क्र. वाय-२, मुख्य लेखाशिर्ष २२१५ पाणी पुरवठा व स्वच्छता, ०१, पाणी पुरवठा, १९६ जिल्हा परिषद पंचायत / संस्थांना सहाय्य, ०२ जिल्हा परिषदांना अनुदान, (०२)(०३) आकस्मिक पिण्याच्या पाण्याच्या टंचाई निवारणार्थ घेण्यात येणा-या तात्पुरत्या उपाययोजनांसाठी जिल्हा परिषदांना सहायक अनुदान (अनिवार्य), ३१, सहायक**

**अनुदाने (वेतनेत्तर) (२२१५ ए १९५) ” या लेखाशीर्षांखाली मंजूर असलेल्या तरतूदीतून भागवावा व त्याखाली अंतिमत: खर्ची टाकण्यात यावा.**

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०५१३१६०४५३६१२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PRAVINKUMAR GULABRAO PAWAR

Digitally signed by PRAVINKUMAR GULABRAO PAWAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER SUPPLY AND SANITATION DEPARTMENT, 2.5.4.20=5d2dad0f66e8336730e2b666877a365c20f60db099de815eecadde01ca77f148, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=8F18625ADB482A7EE2512CEA93CE697388C95A99C89E41E85C05A3DE8476488F, cn=PRAVINKUMAR GULABRAO PAWAR
Date: 2024.05.13 16:25:56 +05'30'

**( प्रविणकुमार पवार)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
२. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
३. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
४. प्रधान सचिव, महसूल ( मदत व पुनर्वसन) विभाग, मंत्रालय, मुंबई
५. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई,
६. महालेखाकार, (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई
७. महालेखाकार, (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर
८. विभागीय आयुक्त, नागपूर
९. जिल्हाधिकारी, वर्धा
१०. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, वर्धा
११. जिल्हा कोषागार अधिकारी, वर्धा
१२. कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, वर्धा
१३. मा. मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
१४. प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
१५. निवड नस्ती ( का- पापु-१४)

**शासन निर्णय क्रमांक: टंचाई २०२४/प्र.क्र. ५२ / पापु -१४ दि.    मे, २०२४ च्या सोबतचे**

**परिशिष्ट**

| अ.क्र. | तालुका | गावाचे नाव | अंदाजित रक्कम |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | आर्वी | सालफळ | ७,१८,२४७ |
| २ | आर्वी | बेढोना | ७,१४,२८५ |
| ३ | कारंजा | बोरी | ३,३२,९१० |
| ४ | कारंजा | काकडा | ४,७०,९६० |
| ५ | कारंजा | ठाणेगाव | २,५५,१४२ |
| ६ | कारंजा | परसोडी | ७,३७,९४३ |
| ७ | आष्टी | सुजातपुर | ९,१८,१५४ |
| ८ | आष्टी | थार | ३,८७,३६४ |
| ९ | आष्टी | बोरगाव टुमणी | ७,२८,४२३ |

PRAVINKUMAR
GULABRAO
PAWAR

Digitally signed by PRAVINKUMAR GULABRAO PAWAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA,
ou=WATER SUPPLY AND SANITATION DEPARTMENT,
2.5.4.20=5d2dad0f66e8336730e2b666877a365c20f60db
099de815eecadde01ca77f148, postalCode=400032,
st=Maharashtra,
serialNumber=8F18625ADB482A7EE2512CEA93CE6973
88C95A99C89E41E85C05A3DE8476488F,
cn=PRAVINKUMAR GULABRAO PAWAR
Date: 2024.05.13 16:26:52 +05'30'

( प्रविणकुमार पवार )
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन